जिल्हा न्यायालय, नाशिक यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अस्थायी ०३१८/४०८/प्र.क्र.६८/कार्यासन ११**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २७ सप्टेंबर, २०१८.

<u>पहा</u> : १. शासन निर्णय वित्त विभाग क्र.असंक १००१/प्र.क्र.२९/२००१, वित्तीय सुधारणा, दि.१०/९/२००१
२. शासन निर्णय क्र.अस्थायी ०३१८/४०८/प्र.क्र.६८/कार्यासन ११, दि.१२/३/२०१८
३. शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क्र., दि.७/९/२०१८
४. जिल्हा न्यायालय, नाशिक यांचे पत्र क्र.EST/३२/५६६६/२०१८, दि.२४/८/२०१८

**शासन निर्णय :**

जिल्हा न्यायालय, नाशिक या आस्थापनेवरील १७१ अस्थायी पदांना संदर्भाकित क्र.२ च्या शासन निर्णयान्वये दि.१/३/२०१८ ते ३०/९/२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. जिल्हा न्यायालय, नाशिक या आस्थापनेवरील पुढील तक्त्यात नमूद केलेल्या १७१ अस्थायी पदांना या शासन निर्णयान्वये दि.१/१०/२०१८ ते २८/२/२०१९ पर्यंतच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | स्वीय सहायक | ०१ |
| २ | अधिक्षक | ०१ |
| ३ | सहाय्यक अधिक्षक | १२ |
| ४ | लघुलेखक (उ.श्रे.) | ०२ |
| ५ | लघुलेखक (नि.श्रे.) | ११ |
| ६ | वरिष्ठ लिपिक | २५ |
| ७ | कनिष्ठ लिपिक | ६७ |
| ८ | संच चालक | ०१ |
| ९ | मुख्य बेलिफ | ०४ |
| १० | बेलिफ | १६ |
| ११ | वाहन चालक | ०२ |
| १२ | पुस्तक बांधणीकार | ०१ |
| १३ | शिपाई- पहारेकरी | २४ |
| १४ | सफाईगार | ०४ |
| **एकूण** | | **१७१** |

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (अनिवार्य) (२०१४ ०१७२ ) ०१, वेतन या लेखाशीर्षाखालील सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क्र., दि.७/९/२०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९२७१५४९४०२८१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Santosh Sampatti Navagire

Digitally signed by Santosh Sampatti Navagire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d8357 9cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f80057927 1f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Santosh Sampatti Navagire
Date: 2018.09.27 15:54:34 +05'30'

**( सं.सं.नवगिरे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,

२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा न्यायालय, नाशिक,

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,

४) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,

५) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,

६) वित्त विभाग, व्यय ५/आ.पु.क.कक्ष/अर्थसंकल्प ११, मंत्रालय, मुंबई,

७) निवडनस्ती (कार्यासन ११).